UGC Pattern

# राजकीय विचारप्रणाली

# Political Ideology

प्रा. ढोबळे डी.बी.



अरुणा प्रकाशन

९

# राजकीय विचारप्रणाली

# (Political Ideology)

**प्रस्तावना :-**

राजकीय व्यवस्थेला आधार पुरविणारा घटक म्हणून विचारप्रणाली कडे पाहिले जाते. प्रत्येक राजकीय व्यवस्थेला आपले समाजावर नियंत्रण प्रस्थापित करावयाचे असते. हे करण्यासाठी लोकांच्या सहर्कायाची आवश्यकता असते. त्यासाठी काही मूल्ये, आदर्श, विचारांचा आश्रय राजकीय व्यवस्थेला घ्यावा लागतो. कोणत्याही राजकीय व्यवस्थेचा पाया बळाचा आधार नसून विचारांचा आधार हा असतो. म्हणून आधुनिक युग हे विचारप्रणालीचे युग आहे असे म्हटले जाते. आज प्रत्येक राजकीय व्यवस्था कोणत्या न कोणत्या विचारप्रणालीशी निगडीत आहे. मुसोलिनी आणि हिटलर यांनी आपल्या सत्तेचे अस्तित्व फॅसिष्ट आणि नाझी विचारसरणीच्या साहयाने टिकवून ठेवले होते. यात शंका नाही. थोडक्यात विचारप्रणाली शिवाय राजकीय व्यवस्थेचे अस्थित्त्व टिकणे अशक्य असते. विचारप्रणाली शिवाय राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय राजकारणाचे स्वरूप समजू शकत नाही . राष्ट्रीय राजकारणात असलेल्या राजकीय पक्षांमधील फरक देखील विचारप्रणालीच्या आधारावरच केला जातो. याचा अर्थ विचारप्रणाली हा समस्त राजकारणाचा आधारच आहे.

'विचारप्रणाली' (Ideology) हा शब्द सर्व प्रथम फ्रेंच तत्वज्ञ डेस्टुट डी ट्रेसी यांनी वापरला. १९ व्या शतकात त्यांनी वापरलेला हा 'विचारप्रणाली' शब्द अलीकडच्या काळात राजकीय विचारातील परवलीचा शब्द बनला आहे. ट्रेसी यांच्या मते विचारप्रणाली हे विचारांचे असे शास्त्र आहे की ज्या शास्त्रात नव्या सामाजिक आणि राजकीय व्यवस्थेचा आधार बनण्याचे सामर्थ्य असेल.' (Science of ideas- a fresh discipline intended to be the basis of an entirely new social and political order.) म्हणजे नव्या व्यवस्थेला आधार पुरविण्याचे सामर्थ्य विचारप्रणालीत असते विचारप्रणाली हा विचारांचा संच असतो. पंचेंद्रियांद्वारे माणसाला जो अनुभव येतो त्याची पडछाया म्हणजे विचार आणि अशा विचारांचा संच म्हणजे विचारप्रणाली होय. राजकीय व्यवस्थेला, व्यवस्थेतील लोकांना सामाजिक आणि राजकीय जीवनाच्या दृष्टीने ज्या विचारांची निवड करावी लागते, ते विचार स्पष्ट करण्यासाठी जी पध्दती असते तीला विचारप्रणाली म्हणतात. थोडक्यात विचारप्रणालीच्या आधरावरच राजकीय व्यवस्थेला अधिमान्यता मिळते.

**विचारप्रणालीचा अर्थ**

**(Meaning of Ideology) :-**

विचारप्रणाली हा शब्द साधारणतः दोन अर्थाने वापरला जातो. १. स्वयंपूर्ण आणि वैश्विक दृष्टीवर आधारित विचांराचा समूह. या अर्थाने विचारप्रणाली मणुष्य प्रकृतीच्या संदर्भात काही तत्वे घेवून चालते. ज्यात मानव इतिहासाचे सिध्दांत, आचरणाचे नियम आणि कार्याचा क्रम तयार केलेला असतो. २. दुसऱ्या अर्थाने विचारधारा ही आपले राजकीय उद्देश्य लपविण्याचे आवरण म्हटले जाते. या अर्थाने अधिमान्यता प्राप्त करण्यासाठी विचारप्रणालीची रचना आणि प्रचार केला जातो. तात्पर्य विचारप्रणाली हे विचारांचे शास्त्र (Science of Thought) असते म्हणजे विचारांचा जन्म भौतिक प्रक्रियांमधून कसा होतो हे अनुभवसिध्द पध्दतीद्वारे शोधणे एवढेच विचारप्रणालीचे प्रयोजन असते. अशी ट्रेसी यांची कल्पना होती. पण अशी मर्यादित व्याख्या आज मान्य होत नाही म्हणून अनेक तत्वज्ञांच्या व्याख्यांचा अभ्यास करावा लागतो. त्या तत्वज्ञांची दोन भागात वर्गवारी करता येते. काही तत्वज्ञ किंवा अभ्यासक विचारप्रणालीकडे सकारात्मक अर्थाने बघतात. त्यांनी विचारप्रणली विषयी चांगली मते व्यक्त केली. म्हणून अनुकूल अर्थाने व्यक्त केलेल्या व्याख्या अशा-



**१. अन्थूली डाऊन्स :-**

"विचारप्रणाली ही उत्तम समाजव्यवस्थेची शब्दांकित प्रतिमा होय. ते एक माध्यम आहे की ज्याद्वारे अशी समाजव्यवस्था निर्माण होवू शकते." (Idealogy is a verberal image of good sociaty) "

**२. स्नायडर आणि विल्सन :-**

"सामाजिक, धार्मिक व राजकीय ध्येयाने निर्माण झालेला, जीवनाशी, समाजाशी आणि शासनाशी संबंधीत झालेला एक विचारांचा समूह म्हणजे विचारसरणी होय. त्याच्या सतत वापरामुळे त्याला एखाद्या राजकीय सत्तेच्या प्रमुख सिध्दांताचे स्वरूप प्राप्त होत असते."

**३. श्लायचर :-**

" व्यक्तींच्या अमुर्त विचारांची एक व्यवस्थाबध्द मांडणी म्हणजे विचारप्रणाली होय."

**४. डेव्हीड इस्टन :-**

" व्यवस्थेतील लोकांना भुतकाळाचा अर्थबोध होईल, वर्तमानकाळ आकलनिय होईल, भविष्यकाळाचे चित्र त्यांच्या दृष्टीक्षेपात येईल, त्या दृष्टीने ध्येय उदिष्ट, हेतू यांचे प्रगटीकरण करण्याची पध्दती म्हणजे विचारप्रणाली होय."

वरील प्रमाणे विचारप्रणालीचा अनूकूल अर्थ सांगितला जात असला तरी डाव्या विचारसरणीच्या लोकांनी प्रतिकूल अर्थाने विचारप्रणालीच्या व्याख्या केल्या आहेत त्या -

**१) कार्ल मार्क्स :-**

" भांडवलशाही स्वरूपाची अर्थव्यवस्था टिकविणे व त्याच पध्दतीने समर्थन करणे या दृष्टीने यातील श्रेष्ठ वर्गातील लोकांनी जे विचार मांडले अशा विचारांच्या समुच्चयाला विचारप्रणाली म्हणतात."

**२. कार्लमॅन हाईम :-**

" समाजातील प्रभावी व्यक्तीकडून त्यांच्या हितसंबंधाना धरून प्रतीगामी पंरपरावादी हितसंबंधाना गैरवाजवीदृष्ट्या अनुकूल पध्दतीने मांडण्यात येणारे विचार म्हणजे विचारप्रणाली होय."

**३. वेल्डन :-**

"विचारप्रणाली एक विद्रुप आणि काहीही उपयोग नसलेली संज्ञा आहे."



अशा प्रतिकूल अंगाने विचारप्रणालीचा अर्थ घेण्यात आला असला तरी राजकारणात विचारप्रणालीने महत्वाची भूमिका पार पाडली आहे. कालपरिवर्तन आणि सामाजिक स्थिती नुसार विचारप्रणालीचा उदय होत असतो. त्यानुसारच त्याचा अर्थही लावला जातो. प्रत्येक राजकीय विचारप्रणाली वर्ग विशेष आणि मुल्यांचे तात्वीक विश्लेषण यावर आधारित असते. जसजसे वर्गीय स्थितीत परिवर्तन होत जाते तसतसे विचारप्रणालीच्या स्वरूपातही परिवर्तन होते. सामाजीक आवश्यकतेनूसार विचारप्रणालीचे स्वरूप बदलत असते. काळ आणि परिस्थितीनुसार विचारप्रणाली प्रगतीशिल किंवा प्रगती विरोधी, क्रांतीकारी किंवा क्रांती विरोधी निर्माण होत असते. आज प्रगतीशिल म्हटली जाणारी विचारप्रणाली पूढे प्रगतीविरोधी मानली जावू शकते. एकेकाळात साम्यवाद हीच जगाच्या उद्धाराची विचारप्रणाली मानली जावू लागली. पण आज साम्यवादाचे तेवढे आकर्षण राहिले नाही. तिला स्वातंत्र्य विरोधी व प्रगती विरोधी मानले जावू लागले आहे.

**विचारप्रणालीची लक्षणे :-**

मानवी जीवनात विचाराला अत्यंत महत्वाचे स्थान असते. विचारांमूळेच व्यक्ती कार्यप्रवण होत असतो. त्यातून त्याची विकासाकडे वाटचाल होते जेव्हा विचारप्रणाली ही राजकीय व्यवस्थेसंबंधी असते, तेंव्हा ती राजकीय विचारप्रणाली असते. विचारप्रणालीमुळेच राजकीय व्यवस्थेला आधार प्राप्त होत असतो. म्हणून राजकीय विचारप्रणालीची काही लक्षणे पूढील प्रमाणे सांगितली जातात.

**१. विचारप्रणाली परिवर्तनीय असते :-**

कोणतीही विचारप्रणाली कायम स्वरूप आणि अखंड असू शकत नाही. म्हणजे एखादी विचारसरणी एखाद्याच काळात प्रभावी असते. पण सर्वच काळात ती प्रभावी मानली जाईल असे म्हणता येत नाही. एकेकाळी भांडवलशाही, साम्राज्यवाद, वसाहतवाद ह्या विचारधारा प्रभावी होत्या. परंतू आज यांना कोणतेही स्थान नाही. म्हणजे विचारधारा हया काळ व परिस्थितीनुसार परिवर्तनीय असतात. विचारधारा कायमस्वरूपी असत नाहीत.

**२. विचारधारा ही राजकीय व्यवस्थेचा आधार :-**

विचारप्रणाली ही केवळ शब्दांचा समुच्चय असत नाही. तर राजकीय व्यवस्थेचा ती आधार असते. एखाद्या राजकीय व्यवस्थेला अधिमान्यता प्राप्त करण्यासाठी विचारप्रणालीचा साधन म्हणून वापर केला जातो. रशियाच्या राजकीय व्यवस्थेला साम्यवादी विचारप्रणालीचा



आधार होता. तर भांडवलशाही ही अमेरिकन राज्य व्यवस्थेचा आधार आहे.

**३. राजकीय व्यवस्थेत विचारप्रणालीचा संघर्ष अटळ :-**

राजकीय व्यवस्थेने स्विकारलेली एखादी विचारसरणी व्यवस्थेतील सर्वांनाच मान्य असते असे नाही. वेगवेगळया विचारसरणीचे लोक तेथे असू शकतात. अशा वैचारिक भिन्नतेमुळे संघर्ष अटळ असतो. सोव्हिएत रशियाची साम्यवादी विचारप्रणाली असली तरी तिला विरोध करणारे अनेक लोक तिथे होते. अशा वैचारिक भिन्नतेमूळेच तेथील साम्यवाद टिकू शकला नाही. भारतात ही वेगवेगळया विचारसरणीचे राजकीय पक्ष आहेत. ध्येय धोरणावरून त्यांच्यात मतभेद दिसून येतात.

**४. कृतीप्रवणता :-**

राजकीय विचारप्रणाली विचारांचा कोरा समुच्चय नसून एक प्रकारे विचारांचा कृती कार्यक्रम असते. प्रेस्टन किंग यांच्या मते, "राजकीय विचारप्रणालीचे महत्व तीच्या प्रयोगावर अवलंबून आहे. ती प्रत्यक्ष राजकीय कार्यवाहीसाठी एक मार्गदर्शक आहे." म्हणजे विचारप्रणाली कृत्तीप्रवण असते, पणतीचा योग्य वापर करणे आवश्यक आहे.

**५. विचारप्रणाली व्यवहारात लवचिक बनते :-**

एखाद्या देशाने स्विकारलेली विचारसरणी जशीच्या तशी उतरविणे अशक्य असते. तीचा व्यवहारात वापर करत असताना परिस्थितीसापेक्ष त्यात बदलाची आवश्यकता असते. उदा. भारताने संसदीय लोकशाहीचा विचार स्विकारला असला तरी इंग्लंड प्रमाणे जशास तशी विचारप्रणाली आपण स्विकारली नाही. भारतीय परिस्थितीच्या संदर्भात त्यात बदल केले. सोव्हिएत रशियाने साम्यवादी व्यवस्थेचा स्वीकार केला असला तरी तेथे संपत्तीचा अधिकार काही प्रमाणात मान्य होवू लागला आहे. म्हणजे विचारप्रणाली व्यवहारात लवचिक बनते.

**६. राजकीय प्रश्नांच्या सोडवणूकीची क्षमता :-**

राजकीय विचारप्रणालीमध्ये राजकीय प्रश्नांच्या सोडवणूकीची क्षमता असते. शासक कोण असतील, त्यांची निवड कशी केली जाईल. ते कोणत्या आधारावर शासन करतील.? अशा अनेक प्रश्नांचे निवारण राजकीय विचारप्रणाली मधून होते.

**७. विचारसरणीचे वर्गीकरण केले जाते :-**

अलिकडे पूरोगामी व प्रतिगामी असे विचारप्रणालीचे वर्गीकरण केले जात आहे. राजकीय व्यवस्थेत विचारप्रणालीची भूमिका लक्षात घेवून त्यावर पुरोगामी अथवा

प्रतिगामी अशी विशेषणे लावली जातात. प्रचलित व्यवस्थेविरूध्द किंवा नवीन विचार मान्य करणारी पुरोगामी विचारसरणी तर प्रस्थापित व्यवस्थेचे समर्थन करणारी व नवीन विचार नाकारणारी प्रतिगामी विचारसरणी समजली जाते. याशिवाय डावी विचारसरणी, उजवी विचारसरणी, उदारवादी विचारसरणी असेही वर्गीकरण केले जाते. थोडक्यात विचारप्रणाली कोणत्याही प्रकारची असली तरी राजकीय व्यवस्था विचारप्रणाली शिवाय आपले अस्तित्व टिकवू शकत नाही.

वरील प्रमाणे विचारप्रणालीची अनेक लक्षणे सांगता येतात. समाजहिताची कल्पना समान असताना ते साध्य करण्यासाठी स्विकारलेले मार्ग जर भिन्न असतील तर अनेक विचारप्रणाली जन्माला येतात. समाजवाद या ध्येयासाठी साम्यवाद व सर्वोदयवाद ह्या दोन्ही मार्गात तफावत आहे. म्हणून दोन विचारप्रणाली उदयाला आल्या. यापैकी कोणतीही विचारसरणी जगमान्य असत नाही. प्रत्येक विचारप्रणालीचे समर्थन करणाऱ्यांप्रमाणेच तीला नाकारणारेही अनेक जण असतात. म्हणून ती परिवर्तनीय असते असे म्हटले जाते.